**नगरपरिषदा/नगरपंचायतींच्या सार्वत्रिक व रिक्त पदांच्या पोटनिवडणूकांकरीता त्या क्षेत्रातील दुकाने, आस्थापना, निवासी हॉटेल, खाद्यगृहे, अन्नगृहे, नाट्यगृहे, व्यापार, औद्योगिक उपक्रम किंवा इतर आस्थापना तसेच माहिती तंत्रज्ञान कंपन्या, शॉपिंग सेंटर्स, मॉल्स, रिटेलर्स इत्यादी आस्थापनांमध्ये कार्यरत असलेल्या मतदारांना मतदानाच्या दिवशी मतदान करण्यासाठी सुट्टी अथवा दोन तासांची सवलत देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक : मतदान २०१८/प्र.क्र.६७/कामगार ९**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- १६ जुलै, २०१८

संदर्भ : राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र यांचे क्रमांक रानिआ/मनपा -२०१८/प्र.क्र.०७/का.६

दिनांक १२/७/२०१८ चे पत्र

**शासन परिपत्रक-**

राज्य निवडणूक आयोगाने नगरपरिषदा/नगरपंचायतींच्या सार्वत्रिक व रिक्त पदांच्या पोट निवडणुकांसाठी २०१८ कार्यक्रम घोषित केला आहे. सदर निवडणूका खालील तक्त्यानुसार होणार आहेत.

| क्र. | सार्वत्रिक निवडणूक | निवडणूकीचा दिनांक |
|---|---|---|
| १ | नागपूर जिल्हयातील वानाडोंगरी नगर परिषदा/ नगरपंचायती | गुरुवार १९/०७/२०१८ |

२. भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २४३ झेडए अन्वये राज्य निवडणूक आयोगावर महानगर पालिकांच्या/जिल्हा परिषद पंचायत समितीच्या निवडणुकांची जबाबदारी सोपविली आहे. मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ चे कलम १४ (४) मधील तरतूदीनुसार निवडणूका शांत, मुक्त व निर्भय वातावरणात घेण्याकरीता निदेश देण्याचे अधिकार राज्य निवडणूक आयोगास आहेत.

३. त्यानुसार उपरोक्त निवडणूक क्षेत्रातील मतदारांना मतदानाचा हक्क बजावण्यासाठी योग्य संधी प्राप्त करुन देण्याच्यादृष्टीने या क्षेत्रात कार्यरत असलेल्या मतदारांना मतदानाच्या दिवशी मतदान करण्यासाठी भरपगारी सुट्टी अथवा कामाच्या तासांमधून मतदान करण्याकरिता दोन तासांची सवलत देण्याबाबत योग्य ते निर्देश सर्व संबंधीतांना तात्काळ देण्याबाबत संदर्भाधीन पत्रान्वये राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र यांनी कळविले आहे.

४. या पार्श्वभूमीवर उपरोक्त मतदान क्षेत्रातील विविध दुकाने, आस्थापना, निवासी हॉटेल, खाद्यगृहे, अन्नगृहे, नाट्यगृहे, व्यापार, औद्योगिक उपक्रम किंवा इतर आस्थापना तसेच माहिती तंत्रज्ञान कंपन्या, शॉपिंग सेंटर्स, मॉल्स, रिटेलर्स इत्यादी आस्थापना यांना सूचना देण्यात येत आहेत की, आपल्या आस्थापनामधील कामगारांना सदर निवडणूकीच्या दिवशी मतदानाचा हक्क बजावण्यासाठी भरपगारी सुट्टी देण्यात यावी.

५. मतदानाच्या दिवशी वरील निवडणूक क्षेत्रात कामगारांच्या अनुपस्थितीमूळे धोका अथवा मोठ्या प्रमाणात नुकसान होईल अशा आस्थापनेतील/ उद्योगातील कामगारांना तसेच माहिती तंत्रज्ञान कंपन्या निर्यात व्यवसायात असलेल्या कंपन्या, कायम/ अखंडीत उत्पादन सुरु असलेल्या कंपन्यामधील कामगारांना मतदानाचा हक्क बजावण्यासाठी दोन तासांची सवलत देण्यात यावी.

६. सदर परिपत्रक राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र यांच्या क्रमांक रानिआ/नपा -२०१८/ प्र.क्र.०७/ का. दिनांक १२/०७/२०१८ च्या पत्रास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८०७१६१३४१०१९११० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish Bhartiya

Digitally signed by Satish Bhartiya
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2bc2294cab74b107d5cfbd8bda13dc5782df4340706cbae9c3aa79354a2cd32b, serialNumber=5e865d0cdc2a4b33d56e3ba0f1693db677c69e1582ba24d78c4b12a02126e493, cn=Satish Bhartiya
Date: 2018.07.16 13:43:40 +05'30'

**( सतिश भारतीय )**

शासनाचे अवर सचिव

**प्रत** - उपरोक्त परिपत्रक सर्व संबंधीत आस्थापनांच्या निदर्शनास आणण्याच्या विनंतीसह अग्रेषित

१. राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र, नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालयासमोर, मुंबई ३२.
२. प्रधान सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
३. कामगार आयुक्त, बांद्रा, मुंबई ५१.
४. संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, बांद्रा, मुंबई
५. संचालक, बाष्पके, बांद्रा, मुंबई
६. जिल्हाधिकारी, नागपूर,
७. आयुक्त, वानाडोंगरी नगर परिषद, नागपूर,
८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
९. कामगार विभागातील सर्व कार्यासने
१०. निवडनस्ती (कामगार ९)

**प्रत माहितीसाठी :**

१. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
३. मा. मुख्यसचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.